**निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन आदेश क्रमांक- इएसटी-०६१७/ प्र.क्र.८४/ राउशु-१**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक -: १२ जुलै, २०१७.

वाचा:- गृह विभाग , शासन आदेश क्रमांक- इएसटी-१२१५/ प्र.क्र. १५६/ राउशु-१, दि. २७.०३.२०१७.

**आदेश**:

राज्य उत्पादन शुल्क विभागातील दुय्यम निरीक्षक (गट-क) या संवर्गातून निरीक्षक (गट-ब) या संवर्गामध्ये एकूण ४० अधिकाऱ्यांना दि. २७.०३.२०१७ च्या शासन आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली आहे. त्यापैकी खालील अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार व प्रशासकीय तथा कौटुंबिक/ वैद्यकीय कारणास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या नियुक्तीच्या ठिकाणामध्ये अंशत: बदल करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील (स्तंभ ४) मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. एस. बी. हनवते | भरारी पथक-१, नागपूर | 'क' विभाग, नागपूर |
| २. | श्री. गुलाब ल. जाधव | मे. गडहिंग्लज स.सा.का., कोल्हापूर | कुर्डूवाडी, सोलापूर |
| ३. | श्री. प्रकाश आ. घायवट | उदगीर, जि. लातूर | 'अ' विभाग, औरंगाबाद |

२. श्री. एस. बी. हनवते यांनी त्यांच्या दि. ३०.०३.२०१७ च्या पत्रान्वये पदोन्नती नाकारली होती. तथापि, त्यांनी दि. १५.०६.२०१७ च्या पत्रान्वये पदोन्नती स्वीकारत असल्याबाबत शासनास कळविले आहे. त्यांची विनंती शासनाने मान्य केली असून त्यांच्या पदस्थापनेत उपरोक्तप्रमाणे अंशत: बदल करण्यात येत आहे. प्रस्तुत प्रकरणी, आयुक्त, राउशु यांना कळविण्यात येते की, त्यांनी सदर अधिकाऱ्याला त्यांच्या उपरोक्त नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर करून घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत .

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी सदर नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजू व्हावे अन्यथा त्यांचेविरूद्ध शिस्तभंगाची कारवाई केली जाईल.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७१२१२५९१५४३२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9aa522e32450ec03b47343bc963097b0e134f043fb205f2e97595f145aaf4d73, cn=Shivaji Baburao Chavan
Date: 2017.07.12 13:04:49 +05'30'

**(शिवाजी चव्हाण)**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति:**

१. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क. (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, सोलापूर, लातूर, कोल्हापूर, औरंगाबाद.
५. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर, सोलापूर, लातूर, कोल्हापूर, औरंगाबाद (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
६. संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७. निवडनस्ती (राउशु-१)